सर्व अकृषी विद्यापीठांमध्ये क्रेडीट सिस्टीम पध्दती अमलात आणण्यासाठी कुलगुरुंची समन्वय समिती (कोअर कमिटी) नियुक्त करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
परिपत्रक क्र. संकीर्ण २०१०/प्रक्र. ४६ /विशि-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ आक्टोबर, २०११.

**प्रस्तावना : -** विद्यापीठ अनुदान आयोगाने सर्व विद्यापीठांनी क्रेडीट सिस्टिम पध्दती राबवावी असे निर्देश यापूर्वीच सर्व विद्यापीठांना दिले आहेत. त्याचप्रमाणे सर्व विद्यापीठांच्या कुलगुरुंच्या संयुक्त परिषदेमध्ये (जे.बी.व्ही.सी) याबाबत चर्चा होऊनही सर्व विद्यापीठांनी क्रेडिट सिस्टिम पध्दती पूर्णपणे अमलात आणलेली नाही. राज्यातील सर्व विद्यापीठांच्या कुलगुरुंची संयुक्त बैठक (जे.बी.व्ही. सी.) दिनांक १६.८.२०११ रोजी संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये या संदर्भात चर्चा झाली. सदर बैठकीत ज्या विद्यापीठांना क्रेडीट सिस्टिम अमलात आणण्या संदर्भात अडचणी आल्या आहेत अशा विद्यापीठांना मार्गदर्शन करण्यासाठी ३ विद्यापीठांच्या कुलगुरुंची समन्वय समिती (कोअर कमिटी) स्थापन करण्याचा निर्णय झाला आहे. सदर निर्णयानुसार ३ विद्यापीठांच्या कुलगुरुंची समन्वय समिती (कोअर कमिटी ) स्थापन करण्याचा निर्णय शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-** वरील सर्व बाबी विचारात घेऊन राज्यातील ज्या अकृषी विद्यापीठांना क्रेडीट सिस्टिम अमलात आणण्या संदर्भात अडचणी आल्या आहेत अशा विद्यापीठांना मार्गदर्शन करण्यासाठी खालीलप्रमाणे ३ विद्यापीठांच्या कुलगुरुंची समन्वय समिती ( कोअर कमिटी ) स्थापन करण्यात येत आहे

कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
कुलगुरु, संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती.
कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

२. ज्या अकृषी विद्यापीठांना क्रेडीट सिस्टिम अमलात आणण्या संदर्भात अडचणी आल्या आहेत अशा विद्यापीठांनी आपल्या अडचणी उपरोक्त समन्वय समितीच्या ( कोअर कमिटी ) निदर्शनास आणाव्यात. सदर समितीने सदर अडचणी दुर करण्याचा प्रयत्न करुन त्या त्या विद्यापीठांमध्ये क्रेडीट सिस्टिम अमलात आणण्या संदर्भात मार्गदर्शन करावे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharrashtra.gov.in या संकेतस्थळावरउपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१११०१७१३३२०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( प्र. गि. कानडे )
कार्यासन अधिकारी

प्रति,
कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे,
कुलसचिव , सर्व अकृषी विद्यापीठे,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई- ४०० ०३५
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण/तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
मा. राज्य मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
सर्व सह सचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
उप सचिव (विशि) , उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (विशि-३)